# महाराष्ट्र शासन

क्रमांक :- संगणक-२०१७/प्र.क्र.०९/संगणक
कक्ष आदिवासी विकास विभाग,
मंत्रालय (विस्तार), मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरू चौक, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १८ ऑगस्ट, २०१७

<u>वाचा</u> :-

१) सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय क्र. GAD-मातंसं ००८/४/२०१४-O/o Directorate of IT-DIT(MH), दि. ०१/०७/२०१४

२) शासनपत्र आदिवासी विकास विभाग क्र. संगणक-२०१४/प्र.क्र.१९/संगणक कक्ष, दि.२८.१.२०१५ अन्वये निर्गमित करण्यात आलेले प्रकल्प अंमलबजावणी समितीच्या दि.२७.१.२०१५ च्या बैठकीचे इतिवृत्त.

३) कार्यारंभ आदेश आदिवासी विकास विभाग क्र. Comp-२०१४/C.R.१९/Computer Cell, दि.३.२.२०१५

४) शासन ज्ञापन समक्रमांक दि. १७ मार्च, २०१७

५) मे.पीडब्ल्युसी प्रा. लि. यांचे दि. १७.मे,२०१७ चे पत्र.

६) मे.पीडब्ल्युसी प्रा.लि.यांचे दि.१४ जुलै, २०१७ चे पत्र.

<u>ज्ञापन</u> :-

अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई यांना कळविण्यात येते की, आदिवासी विकास विभागाच्या प्रकल्प अंमलबजावणी समितीच्या दि.२७.१.२०१५ च्या बैठकीमध्ये घेण्यात आलेल्या निर्णयानुसार विभागांतर्गत ई-गव्हर्नन्स विषयक प्रकल्प राबविण्यासाठी मे. पीडब्ल्यूसी प्रा. लि. या कंपनीकडून आदिवासी विकास विभागाच्या मंत्रालयीन स्तरावर एक वरिष्ठ सल्लागार तसेच आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक, आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे यांच्या कार्यालयाकरिता प्रत्येकी एक सल्लागार यांची नियुक्ती करण्याकरिता दि. ३ फेब्रुवारी, २०१५ च्या कार्यारंभ आदेशाद्वारे मंजूरी देण्यात आलेली होती. या तीन सल्लागारांच्या मासिक मानधन व प्रवासापोटी झालेल्या खर्चास यापूर्वी १७ मार्च, २०१७ च्या ज्ञापनांअन्वये मंजूरी देण्यात आलेली होती. आता, मे.पीडब्ल्युसी लि. यांनी ३ सल्लागारांची मासिक मानधनाची माहे मे, २०१७ व जून २०१७ या दोन महिन्यांची देयके दि.१४ जुलै २०१७ च्या पत्रान्वये शासनास सादर केलेली आहेत.

२. या तीन सल्लागारांच्या मासिक मानधनाचा तपशिल पुढीलप्रमाणे आहे:-

| अ.क्र. | इनव्हॉईस क्र. व दिनांक | मनुष्यबळ संख्या | महिना | मासिक मानधन | मागणी केलेला प्रवास व इतर खर्च | नियमानुसार प्रवास व इतर खर्चाची देय रक्कम | सेवाकर | स्वच्छ भारत उपकर @ ०.५०% | कृषि कल्याण उपकर @०.५० % | एकूण (.रु) १० = +८+७+६+५) (९ |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० |
| १ | ४१६१११९५८ दि.३०.०५.२०१७ | ३ | मे २०१७ | ५,४०,००० | ० | ० | ७५,६०० | २,७०० | २,७०० | ६,२१,००० |
| २ | ४१६१२१७९५ दि.३०.०६.२०१७ | ३ | जून २०१७ | ५,४०,००० | ० | ० | ७५,६०० | २,७०० | २,७०० | ६,२१,००० |
| | | | | | एकूण ( बारा लक्ष बेचाळीस हजार फक्त ) | | | | | १२,४२,००० |

३. मे. पीडब्ल्यूसी प्रा. लि. या कंपनीकडून नियुक्त करण्यात आलेल्या एक वरिष्ठ सल्लागार तसेच दोन सल्लागार अशा एकुण तीन सल्लागारांच्या माहे मे व जून, २०१७ या कालावधीसाठी दोन महिन्यांचे मासिक मानधन व प्रवासभत्त्याची **एकूण रु. १२,४२,००० /- ( रुपये बारा लक्ष बेचाळीस हजार फक्त) इतकी रक्कम मे.पीडब्ल्युसी लि. यांना अदा करण्यास** याद्वारे शासन मंजूरी देण्यात येत आहे. ही रक्कम नियमानुसार टीडीएस कपात करुन धनादेश/आरटीजीएस/ एनईएफटी व्दारे Price Water house Coopers Private Limited यांना अदा करण्यात यावी. तसेच टीडीएस कपात केल्याबाबतचे प्रमाणपत्रही त्यांना देण्यात यावे.

४. प्रमाणित करण्यात येते की, मे.पीडब्ल्युसी प्रा. लिमिटेड या कंपनीकडून एक वरिष्ठ सल्लागार व दोन सल्लागार नेमण्यास प्रकल्प अंमलबजावणी समितीच्या दि.२७.०१.२०१५ च्या बैठकीमध्ये मान्यता घेण्यात आली आहे.

५. सदर सल्लागारांना सामान्य प्रशासन विभागाच्या दि.१.७.२०१४ च्या शासन निर्णयामध्ये नमूद केलेल्या दराने मासिक मानधन व अन्य भत्ते देय आहेत. त्यानुसार पीडब्ल्युसी प्रा. लि. यांनी सादर केलेल्या देयकाची तपासणी करण्यात आलेली आहे.

६. मे. पीडब्ल्युसी प्रा. लिमिटेड यांनी सदर प्रमाणे रक्कम प्राप्त झाल्यावर पोचपावती व कार्यपूर्ती अहवाल तात्काळ शासनास सादर करावा.

७. सदर खर्च "मागणी क्र. टी-४ अंतर्गत मुख्य लेखाशिर्ष २२५१, सचिवालय-सामाजिक सेवा (००)(९०) (००)(०३) इ-गव्हर्नन्स प्रकल्पाची अंमलबजावणी करण्यासाठी तरतूद करणे (२२५१ ०८४८) १७ संगणक खर्च" या लेखाशिर्षातंर्गत सन २०१७-२०१८ या वित्तीय वर्षाकरिता उपलब्ध असलेल्या मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा व तो त्याच लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

८. शासन निर्णय वित्त विभाग क्र. विअप्र २०१३/प्र.क्र.३०/विनियम, भाग-२, दिनांक १७/४/२०१५ सोबतच्या परिशिष्टामधील वित्तीय अधिकार नियमपुस्तिका, १९७८ मधील भाग-पहिला, उपविभाग-२ च्या अ.क्र. २७ (अ) नियम क्र. ७६ नुसार प्रशासकीय विभागाना प्रदान केलेल्या वित्तीय प्राधिकारानुसार सदरहू ज्ञापन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०१७०८१९१२०२१४९४२४ असा आहे. हे ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Bhikan Thakur

Digitally signed by Bhikan Thakur
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tribal Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=7b2c9dcf450d0b904c114bda838cde685bef168cb7e8459d91bff665f705c3ea, cn=Bhikan Thakur
Date: 2017.08.19 11:53:05 +05'30'

(बी.ओ.ठाकूर)
कक्ष अधिकारी

**प्रति,**

१) प्रधान सचिव, माहिती व तंत्रज्ञान विभाग, मंत्रालय, मुंबई
२) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
३) महालेखापाल, महाराष्ट्र १ (लेखापरिक्षा/लेखा व अनुज्ञेयता) मुंबई
४) आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक
५) आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे.
६) उप सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२
७) उपसचिव (रोखशाखा/का-६), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
८) उपसचिव (संगणक कक्ष), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
९) कक्ष अधिकारी (का-६), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०) लेखाधिकारी (रोख शाखा), आदिवासी विकास विभाग मंत्रालय, मुंबई याना देयकाच्या मुळ प्रतीसह
११) मे. पीडब्ल्युसी प्रा. लिमिटेड, बिल्डींग ८, ७ वा आणि ८ वा मजला, टॉवर बी, डीएलएफ सायबर सिटी, गुरगाव, हरयाणा-१२२००२.
१२) निवडनस्ती ( संगणक कक्ष).